टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे येथील मुलां-मुलींचे वसतीगृह इमारतीचे बांधकाम करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक: टिमवि-२०२३/ई-६४७६२६/विशि-२**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.

दिनांक : २८ मार्च, २०२५.

**संदर्भ** :- १. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : टिमवि-२०२३/प्र.क्र.८३/विशि-२ दि.२७.०२.२०२४.

२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक : टिमवि-२०२३/प्र.क्र.८३/विशि-२ दि.१५.०३.२०२४.

३. अध्यक्ष, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.प्रशा/२०२४-२५/१९४१, दि.११.०२.२०२५.

**ज्ञापन** :-

टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे येथे मुलां-मुलींचे वसतीगृह इमारत बांधकाम करण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील दि.२७.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.३४५०.८० लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन वसतीगृह इमारत बांधकामासाठी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रु.५००.०० लक्ष एवढा निधी वितरीत केला आहे. आता सदरहू बांधकाम तातडीने पूर्ण होण्यासाठी संदर्भ क्र.३ येथील पत्रान्वये उर्वरित निधी देण्याची विनंती केली आहे. त्यासअनुसरुन टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे येथील मुलां-मुलींचे वसतीगृह इमारतीचे बांधकाम करण्यासाठी रु.१०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतकी तरतूद खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. **अटी व शर्ती :-**

१. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजुर केले आहे, त्याच उद्दिष्टासाठी वापर करावा आणि त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक (उच्च शिक्षण), पुणे यांचेमार्फत तात्काळ शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

२. बांधकामाची प्रगती शासनास वेळोवेळी अवगत करावी.

३. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

४. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरण परत्वे महालेखापाल-२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना

तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

३. सदरहू मंजूर झालेला निधी टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे यांना तातडीने उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

४. या कामासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (०७) सर्वसाधारण शिक्षणासाठी विद्यापीठांना अनुदाने (अनिवार्य) (२२०२ ०७४५), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२४, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/ अर्थ-३ दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. दि.२५.०७.२०२४ परिपत्रकातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

६. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या सहमतीने (अनौपचारिक संदर्भ क्र.३८१/व्यय-५ दि.१८.०३.२०२५) निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२८१४४१४६४४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2025.03.28 14:42:47 +05'30'

**(प्रताप पां लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री, (नगर विकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

७. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (उच्च व तंत्र शिक्षण), मंत्रालय, मुंबई.
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
११. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. कुलसचिव, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे.
१३. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१५. अवर सचिव (अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.